मुंबई कुळवहिवाट व शेतजमीन अधिनियम १९४८ कुळाच्या घराखालील जमिनीच्या मालकीकरीता “कट ऑफ डेट” निश्चितीबाबत............

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

## शासन परिपत्रक क्रमांकः जमीन-११/२०१३/प्र.क्र.५०१/ज-१

३२ वा मजला, जागतीक व्यापार केंद्र, सेंटर वन इमारत
मुंबई-४०० ००५
तारीख: ०४ ऑगस्ट, २०१४

**वाचा**

१.महसुल व वन विभाग, अधिसूचना क्र:-टीएनसी ६७९८/प्र.क्र.३०१२/ल-९, दि.२९/०५/२०००.

२.विभागीय आयुक्त यांचे पत्र क्र.मशा/कार्यासन-४/टेनन्सी-१/कावि-१९२७/२०१४ दि.१२.५.२०१४

३.अवर सचिव (समिती), विधानमंडळ सचिवालय यांचे पत्र क्र.४५६६८/मविस/विपविअ/ड-११, दि.२१.११.२०१३

**प्रस्तावना**

कोकणातील बेदखल कुळांच्या समस्यांच्या संदर्भात, विधान परिषद विनंती अर्ज समितीसमोर दिनांक १२-११-२०१३ रोजी मा.अ.मु.स.(महसूल) यांची साक्ष घेण्यात आली होती. त्यावेळी जिल्हाधिकारी, रत्नागिरी व सिंधुदुर्ग हे देखील साक्षीसमयी उपस्थित होते. सदरील साक्षीच्या दरम्यान कुळांच्या ताब्यात असलेल्या घरांखालील जमिनी या जमिनींची कुळांच्या नांवे विक्री होण्याबाबत व त्याअनुषंगिक असलेली “ कट ऑफ डेट ” निश्चित करण्याबाबत चर्चा झाली.

महसूल व वन विभागाने मुंबई कुळवहिवाट व शेतजमीन अधिनियम १९४८ च्या कलम १६ व १७-ब मधील तरतुदीनुसार घरांखालील जमिनी या जमिनींची कुळांच्या नांवे विक्री होण्याबाबत व त्याअनुषंगिक “ कट ऑफ डेट ” निश्चितीसाठी क्रमांक टिएनसी-६७९८/प्र.क्र.३०१२/ल-९, दिनांक २९.०५.२००० अन्वये अधिसूचना निर्गमित केली असून ती दिनांक २९.५.२००० चे असाधारण शासन राजपत्रात प्रसिध्द केली आहे. त्यानुसार घराखालील /घरठाणाची जमीन संबंधित कुळाने अथवा त्यांच्या उत्तराधिकारी, वारस यांनी दिनांक १ मे, २००० या दिवशी खरेदी केली असे मानावयाचे आहे व त्याची खरेदी किंमत निश्चित करावयाची आहे, अशी तरतुद करण्यात आलेली आहे.

तथापि, जिल्हाधिकारी कार्यालयातील अधिकारी आणि क्षेत्रिय महसुली यंत्राणाना या अधिसुचनेबाबत पुरेशी माहिती नसल्याने,तसेच प्रसिद्दीअभावी जनसामान्यांना देखील याबाबत माहिती नसल्याने या अधिसूचनेन्वये केलेल्या सुधारणेची अमंलबजावणी परिणामकारक होत नसल्याचे दिसुन येते. त्यामुळे कुळांच्या घराखालील जागा त्यांच्या नावे करण्याकरीता या शासन राजपत्रातील “कट ऑफ डेट” च्या अधिसूचनेतील सुधारणेला पुरेशी व व्यापक प्रसिध्दी देण्याकरिता सर्व विभागाचे विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांना कळविण्याच्या उद्देशाने सर्वंकष सुचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचारधिन होती.

## शासन परिपत्रक

उपरोक्त प्रस्तावनेतील वस्तुस्थिती विचारात घेऊन, सर्व क्षेत्रीय महसूली यंत्रणा व अधिकारी यांना कळविण्यात येते की, मुंबई कुळवहिवाट व शेतजमीन अधिनियम १९४८ च्या कलम १६ व १७-ब मधील तरतुदीनुसार घरांखालील जमिनी या जमिनींची कुळांच्या नांवे विक्री होण्याबाबत व त्याअनुषंगिक असलेली “ कट ऑफ डेट ” निश्चित करणेबाबत संदर्भाधीन क्रमांक १ येथे नमुद अधिसूचना निर्गमित केली असून ती दिनांक २९.५.२००० रोजीच्या असाधारण शासन राजपत्रात प्रसिध्द केली आहे. (सदर अधिसूचनेची प्रत सोबत जोडली आहे.)

०२. त्यानुसार घरठाणाची जमीन संबंधित कुळाने अथवा त्यांच्या उत्तराधिकारी, वारस यांनी दिनांक १ मे, २००० या दिवशी खरेदी केली असे मानावयाचे आहे व त्याची खरेदी किंमत निश्चित करावयाची आहे, अशी तरतुद करण्यात आलेली आहे. कुळ कायदा कलम १६ व १७-ब मधील तरतुदीं अनुषंगाने दिनांक २९.५.२००० च्या अधिसूचनेअन्वये कुळांच्या घराखालील जमिनींच्या मालकीकरीता दिनांक १ मे, २००० ही “कट ऑफ डेट” म्हणून निश्चित केली आहे. तथापि, या अधिसूचनेबाबत क्षेत्रीय यंत्रणा व जनसामान्यांना पुरेशी माहिती नसल्याने अमंलबजावणी होत नाही. त्यामुळे उपरोक्त अधिसूचनेस व त्याअन्वये निश्चित केलेल्या “कट ऑफ डेट” ला विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांनी व्यापक व पुरेशी प्रसिध्दी द्यावी.

०३. सदर अधिसूचनेच्या प्रती, प्रत्येक जिल्हाधिकारी, उपविभागीय अधिकारी, तहसिलदार यांच्या कार्यालयातील सूचना फलक (नोटीस बोर्ड) वर डकवूनदेखील प्रसिध्दी द्यावी.

०४. या सूचनांची अंमलबजावणी या अधिसूचनेतील सुधारणे अनुषंगाने प्राप्त अर्ज व प्रलंबित प्रकरणांवर अधिनियम व नियमांतील तरतूदीअन्वये सर्व संबंधित अधिकारी व प्राधिकारी यांनी शिघ्रतेने कार्यवाही करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०४१४४५४६९११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Shridharrao Kothekar

Digitally signed by Sunil Shridharrao Kothekar
DN: CN = Sunil Shridharrao Kothekar, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2014.08.04 15:23:21 +05'30'

**( सुनिल कोठेकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
२) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव/वि.का.अ., मंत्रालय, मुंबई
३) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मुं.-०५
५) विभागीय आयुक्त, कोकण विभाग,कोकण भवन, सीबीडी बेलापूर,नवीमुंबई.
६) सर्व विभागीय आयुक्त/उपायुक्त (महसूल) विभागीय आयुक्तांचे कार्यालय
७) महालेखा परिक्षक (लेखापरिक्षा/लेखाअनुज्ञेयता),नागपूर/मुंबई
८) जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य पुणे
९) सर्व जिल्हाधिकारी/अपर जिल्हाधिकारी, कोकण विभाग,
१०) सर्व निवासी उपजिल्हाधिकारी /उपजिल्हाधिकारी/तहसिलदार
११) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोकण विभाग
१२) उप सचिव (ज-१), यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मुंबई-०५
१३) सर्व सह सचिव/उपसचिव, महसूल व वन विभाग, जा.व्या.केंद्र, मुंबई-०५
१४) कक्ष अधिकारी (ल-१ ), महसूल व वन विभाग
१५) "ज" समूहातील सर्व कार्यासन अधिकारी/अवर सचिव, महसूल व वन विभाग
१६) निवडनस्ती ज १

असा. क्र. १५०

रजिस्टर्ड नं. एमएच/एमबीआय-साऊथ/२०/२०००




# महाराष्ट्र शासन राजपत्र

**असाधारण**

**प्राधिकृत प्रकाशन**

**सोमवार, मे २९, २०००/ज्येष्ठ ८, शके १९२२**

**स्वतंत्र संकलन म्हणून फाईल करण्यासाठी या भागाला वेगळे पृष्ठ क्रमांक दिले आहेत**

## भाग चार-ब

**महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्र अधिनियमांन्वये तयार केलेले (भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश.**

**महसूल व वन विभाग**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २९ मे २०००

**अधिसूचना**

**मुंबई कुळ वहिवाट व शेत जमीन अधिनियम, १९४८.**

क्रमांक टीएनसी. ६७९८/प्रक्र. ३०१२/ल-९.—मुंबई कुळ वहिवाट व शेत जमीन अधिनियम, १९४८ (सन १९४८ चा मुंबई अधिनियम ६७) च्या कलम, १७ ब च्या पोट-कलम (२) अन्वये मिळालेल्या शक्तीचा वापर करून, महाराष्ट्र शासन याद्वारे उक्त कायद्याच्या कलम १७ब च्या पोट-कलम (२) च्या प्रयोजनासाठी १ मे २००० ही तारीख विनिर्दिष्ट करीत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**गीता पं. दिवाडकर,**
शासनाच्या उप सचिव.

## REVENUE AND FORESTS DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 29th May 2000

*NOTIFICATION*

BOMBAY TENANCY AND AGRICULTURAL LANDS ACT, 1948.

No. TNC. 6798/CR-3012/L-9.—In exercise of the powers conferred by sub-section (*2*) of section 17B of the Bombay Tenancy and Agricultural Lands Act, 1948 (Bom. LXVII of 1948), the Government of Maharashtra hereby specifies the 1st day of May 2000, to be the date for the purposes of sub-section (*2*) of section 17B of the said Act.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

GEETA P. DIWADKAR,
Deputy Secretary to Government.

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.